चोरद (संग्राहक) लघु पाटबंधारे योजना ता. मंगरूळपीर जि. वाशिम या योजनेस सुधारित प्रशासकिय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्रमांकः लपायो -२२१२/(४९५)/१२/लपा-२
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२ .
तारीख: १७.०७.२०१४

पहावे

१) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र क्र. १२३०६/गोमपाविमं/कातां७/(१९/२००८) दि. २४ डिसेंबर, २०१२.
२) वित्त विभाग पत्र क्र. व्यअसं-२०१४प्रक्र/अर्थसं.२ दि. २८ मार्च, २०१४.

प्रस्तावना

विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळा अंतर्गत असलेल्या चोरद (संग्राहक) लघुपाटबंधारे योजना ता. मंगरुळपीर जि. वाशिम या योजनेस महामंडळ निर्णय क्र विपाविम/कांतां७/४/चोरद/प्रमा/(१९/२००९)/२००९ दि. ०७.०१.२००९ अन्वये एकूण अंदाजित खर्च रू. ६४२.१६ लक्ष किंमतीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली . यापैकी रू. ५९६.९१ लक्ष कामाप्रीत्यर्थ आणि ४५.२५ लक्ष अनुषंगिक खर्च आहे. हा प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव तयार करतांना सन २००८-०९ च्या दरसूचीप्रमाणे अनुज्ञेय दर वापरण्यात आले होते. योजनेच्या कामास जानेवारी २०१० मध्ये सुरूवात झाली. मध्यंतरीच्या काळात योजनेच्या किंमतीत दरसूचीतील वाढ, भूसंपादन खर्चातील वाढ, जास्त दराची निविदा स्विकृती, संकल्पनातील बदल व इतर कारणांमुळे प्रशासकीय मान्यता प्राप्त किंमतीच्या दहा टक्क्याहून अधिक वाढ होत असल्यामुळे योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणे बाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय

चोरद (संग्राहक) लघुपाटबंधारे योजना ता. मंगरुळपीर जि. वाशिम या योजनेचा एकूण अंदाजीत खर्च रुपये १०४३.४२४ लक्ष (रू. दहा कोटी त्रेचाळीस लक्ष बेचाळीस हजार चारशे, मात्र) किंमतीस, योजनेची उर्वरित कामे सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या किंमतीत पुर्ण होईल, या अटीच्या अधीन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

सदर रकमेपैकी रुपये ९९२.२९५ लक्ष (रुपये नऊ कोटी,ब्याण्णव लक्ष, एकोणतीस हजार पाचशे, फक्त) कामाप्रीत्यर्थ व रुपये ५१.१२९ लक्ष (रुपये, एक्कावन लक्ष, बारा हजार, नऊशे,फक्त) अनुषंगीक खर्च आहे. अंदाजपत्रकात कामासाठी सन २०११-१२ या वर्षाच्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले आहेत. उपशिर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबत परिशिष्टामध्ये जोडला आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्र. आय-५,"४७०२ लहान पाटबंधाऱ्यावरील खर्चपंचवार्षिक योजनांतर्गत योजना ८०-सर्वसाधारण (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (००) (०५) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान योजनांतर्गत,

(संगणक सांकेतांक क्र. ४७०२ ५१०१)" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकिय मान्यता (६५/२०१४) अनुक्रमांकावर नोंदण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७२२१३५०४८४१२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Baburao Kshirsagar

Digitally signed by Rajendra Baburao Kshirsagar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rajendra Baburao Kshirsagar
Date: 2014.07.22 13:47:54 +05'30'

**( रा.बा. क्षीरसागर)**
शासनाचे अवर सचिव

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
३. वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई ३२
४. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई ३२.
५. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
६. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती
(सोबत सुधारित प्रशासकीय मान्यतेची परिनिरीक्षण टिप्पणी जोडली आहे)
७. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. जिल्हाधिकारी, वाशिम
९. अधीक्षक अभियंता, वाशिम पाटबंधारे मंडळ, वाशिम
१०. कार्यकारी अभियंता, लातुर पाटबंधारे विभाग, वाशिम
११. अर्थशाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. (२ प्रती)
१३. लपा-२, संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक : लपात-२२१२/(४९५/१२) लपा-२ दि. १७.०७.२०१४ चे परिशिष्ट**
**चोरद (संग्राहक) लघुपाटबंधारे योजना ता. मंगरुळपीर जि. वाशिम**
**उपशिर्षनिहाय तरतूदींचा गोषवारा**

| क्र. | तपशिल | प्रस्तावित सुधारित प्र. मा. नुसार (दरसुची २०११-१२) रक्कम रू. लाखात |
|---|---|---|
| १ | 'ए' प्राथमिक कामे | १.३४ |
| २ | 'बी' भूसंपादन | ४८१ |
| ३ | 'सी' कामे | ४५७.०६ |
| ४ | 'डी' मुख्य विमोचक | १६.७५ |
| ५ | 'के'इमारती | ८.७६ |
| ६ | "एम' वनीकरण | १ |
| ७ | 'ओ' संकिर्ण | २.१९ |
| ८ | 'पी' देखभाल | २.१९ |
| ९ | 'आर' दळणवळण | २१ |
| १० | एक्स पर्यावरण | १ |
| | **एकूण** | **९९२.२९५** |
| | **अनुषंगिक खर्च** | **५१.१२९** |
| | **एकूण** | **१०४३.४२४** |

**ठळक बाबी**

अ) या योजनेची सिंचन क्षमता ३९० हेक्टर आहे.

ब) या योजनेमुळे एकूण होणारा पाणीसाठा २.२३ द.ल.घमी. आहे.

क) प्रति सहस्त्र घनमीटर पाणीसाठा किंमत रू. ४५,४२६/- (मापदंड रू. ३८,३१६ /-)

ड) आर्थिक परतावा दर १८.४५ > १२.००

इ) लाभव्यय गुणोत्तर १.२५ (एकापेक्षा अधिक)

.